**सहयाद्री व्याघ्र प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन करण्यासाठी प्रकल्प अधिकारी यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-०८१८/प्र.क्र.३३२/फ-१**
मंत्रालय मुंबई, ४०० ०३२
दिनांक:- ०१ जानेवारी २०२०.

वाचा - १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक. डब्ल्यूएलपी-१०१२/प्र.क्र.१२२/फ-१, दिनांक. ०३.११.२०१२.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक. डब्ल्यूएलपी-०८१८/प्र.क्र.३३२/फ-१ , दिनांक १४.०९.२०१८.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक. डब्ल्यूएलपी-२०१८/प्र.क्र.४८१/फ-१, दिनांक १ मार्च, २०१९.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२२(६)/ योजना/प्र.क्र.७०/२०३७/२०१९-२०/ नागपूर . दिनांक. २०.०८.२०१९.

**प्रस्तावना :-**

सहयाद्री व्याघ्र प्रकल्पातील गावांचे पुनर्वसन शिघ्र गतीने होण्याकरिता व पुनर्वसनाच्या कामांचे सर्वसाधारण नियंत्रण व देखरेख करण्याकरिता महाराष्ट्र प्रकल्प बाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ चे कलम २(११) नुसार उपसंचालक,सहयाद्री व्याघ्र प्रकल्प स्थित कराड यांची प्रकल्प अधिकारी म्हणून संदर्भीय शासन निर्णय क्र. २ अन्वये नियुक्ती करण्यात आली आहे. संदर्भीय शासन निर्णय क्र. ३ अन्वये सहयाद्री व्याघ्र राखीव क्षेत्राच्या प्रभावी व्यवस्थापनासाठी विभागीय वन अधिकारी या संवर्गातील पद निर्माण करण्यात आले असून, त्याचे पदनाम विभागीय वनअधिकारी (वन्यजीव), चांदोली राष्ट्रीय उद्यान असे करण्यात आले आहे. यामुळे उपसंचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प यांचे कार्यक्षेत्रात केवळ कोयना वन्यजीव अभयारण्याचे क्षेत्र आहे. संदर्भीय शासन निर्णय क्र. १ प्रमाणे ज्याचे कार्यक्षेत्रात पुनर्वसन होणार आहे त्या क्षेत्राचे सबंधित उपवनसंरक्षक (प्रादेशिक) हे पुनर्वसनाकरिता पदसिध्द प्रकल्प अधिकारी आहे. संदर्भीय पत्र क्र. ४ अन्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक १४.०९.२०१८ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन दिनांक ०३.११.२०१२ रोजीच्या शासन निर्णयाच्या तरतूदींप्रमाणे प्रकल्प अधिकारी कायम ठेवण्याबाबत शिफारस केली आहे.

**शासन निर्णय :-**

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक. डब्ल्यूएलपी-०८१८/प्र.क्र.३३२/फ-१ , दिनांक १४.०९.२०१८ अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. अभयारण्ये, राष्ट्रीय उद्याने तथा अन्य वन प्रकल्पामुळे बाधित होणा-या कुटुंबाचे पुनर्वसनाकरिता प्रकल्प अधिकारी बाबतचे धोरण शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-१०१२/प्र.क्र.१२२/फ-१ दिनांक ३ नोव्हेंबर, २०१२ मधील तरतूदींप्रमाणे कायम राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०१११०९१७८२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2020.01.01 11:18:05 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
५. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) कोल्हापूर.
७. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर
८. जिल्हाधिकारी, सांगली
९. उप वनसंरक्षक(प्रादेशिक), कोल्हापूर
१०.उपसंचालक, सहयाद्री व्याघ्र राखीव कोल्हापूर स्थित कराड.
११.फ-१ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२ ( निवडनस्ती ).